


# चिको मेंडिस

## जंगलासाठी लढा

लेखक :सुसान देस्तेफांनो
चित्रे :लॉरी रेमण्ड्स

# अनुक्रमणिका



**"मला समजलं आहे की हा आमचा संघर्ष संपूर्ण मानवजातीसाठी आहे."**

## प्रकरण १ संघर्षाची ठिणगी

१९८६ चा उन्हाळा संपत आला होता. काही पुरुष, स्त्रिया व मुलांचा एक समूह एकत्रितपणे एका मोठ्या कुरणातून चालला होता. हे कुरण पश्चिम ब्राझीलच्या एका टोकाला, ॲमेझॉन जंगलाच्या मध्यभागी, गुराढोरांच्या चरण्यासाठी राखलेले होते.

गुरे चारण्यासाठी जंगलच्या या भागातील झाडे तोडून ती जाळली गेली होती. एकेकाळी झाडांनी, वृक्षांनी भरून गेलेल्या त्या जमिनीवर आता प्रखर सूर्यकिरणांमुळे फक्त रापलेल्या गवताचा थर उरला होता.

ही रापलेली भुरी जमीन तिच्या सभोवतालच्या घनदाट जंगलांपेक्षा पूर्णपणे वेगळी होती. सभोवताली असणारं बारमाही जंगल हे शेकडो वर्षांपासून भरपूर सूर्यप्रकाश आणि सततच्या पावसामुळे चांगलेच घनदाट झाले होते. इतकं की दिवसासुद्धा तिथे अंधार पडलेला असे. आसमंतात पक्ष्यांचा किलबिलाट आणि पानापानात लपलेल्या कीटकांचे आणि पतंगांचे आवाज भरून रहात असत. दाट झाडं आणि वेलींनी जणू मांडव घातला होता. समृद्ध, विपुल हिरव्या पानांचे छत मिळाल्यामुळे दक्षिण अमेरिकेतलं कडक ऊनही जंगलाच्या जमिनीपर्यंत पोचत नसे.



त्या होरपळून टाकणाऱ्या उन्हात पायी चालणाऱ्या त्या समूहाला उन्हापासून वाचवण्यासाठी जवळपास एकाही झाडाचा आसरा नव्हता. पक्षी किंवा कीटकांचे नादमयी आवाजही साथीला नव्हते. जर आवाज असलाच तर, तो फक्त या वैराण जमिनीवर पडणाऱ्या पावलांचा बारीक आवाज.

या समूहामधे सर्वांच्या पुढे असलेला माणूस हा काहीसा बुटका, पोट पुढे आलेला, काळे कुरळे केस असणारा आणि चेहऱ्यावर कायम ओळखीचं हसू असणारा होता. त्याच्या मानेवरचे केस वाढलेले होते आणि कुरळेपणामुळे उलटे फिरवलेले दिसत होते. ते त्याचं कपाळ झाकत होते. त्याचे मोठे तपकिरी डोळे त्याचं शांत व्यक्तिमत्व दर्शवत होते. तो हसला की त्याच्या डोळ्यांखाली सुरकुत्या पडत. त्याच्या तोंडाच्या हालचालीमुळे त्याच्या झुपकेदार मिश्याही लक्षात येत. तो चिको मेंडिस होता.



त्या गटातल्या इतर लोकांप्रमाणेच मेंडिसही आयुष्यभर झाडांतून रबर काढून गोळा करण्याचे काम करत असे. रबराच्या झाडाला खाच मारून झाडाच्या सालातून निघणारा चीक गोळा करण्याचे त्यांचे दिवसभराचे काम होते. हा चीक, ज्याला लॅटेक्स म्हटले जाते, तो अनेक टायर्स, क्रीडाप्रकारांसाठी लागणाऱ्या वस्तू, खेळाडूंचे बूट आणि रबरापासून बनणाऱ्या इतर वस्तू बनवण्यासाठी उपयोगात आणला जातो.

या रबर गोळा करणाऱ्या लोकांचा उदरनिर्वाह लॅटेक्सच्या विक्रीतून चाले. ते लोक झाडाला किंवा जंगलांना काही इजा न करता झाडांपासून लॅटेक्स काढत. अशा प्रकारे, झाडांना किंवा जंगलांना कोणतीही हानी पोहोचवू न देता जंगलातून उपयुक्त सामग्री गोळा करणे, ज्यामुळे जंगलातील जमीन आणि झाडं दोन्ही शाबूत राहतात, त्याला आपण शाश्वत शेती असं म्हणतो.

पण त्या ॲमेझॉनच्या जंगलात प्रत्येकजण अशा टिकाऊ शेतीच्या पद्धतीचा अवलंब करीत नव्हता. असे बरेच लोक होते जे या पर्जन्य-वनांचा, जंगलांचा नाश करून पैसे कमावत होते.

पशुसंवर्धन आणि शेतीसाठी दरवर्षी हजारो एकर जंगल कापलं जात होतं. जंगलतोड होत होती. बांधकामाच्या धंद्यात असलेल्या कंपन्या, नवीन रस्ते तयार करण्यासाठी जंगलांचे लांबच्यालांब मोठे पट्टे कापून काढत असत. इमारती लाकडाचे व्यावसायिक, शेकडो वर्षांपासून वाढत असलेली झाडे लाकडासाठी खुशाल तोडून टाकत. पावसाच्या जंगलात वाहणाऱ्या अनेक नद्या आता खाणउद्योगांमध्ये वापरल्या जाणाऱ्या रसायनांमुळे प्रदूषित झाल्या होत्या.

अति वेगाने हे पर्जन्य-वन नष्ट होत होते. जंगल तोडले जात होते, जाळले जात होते, प्रदूषित होत होते. त्यामुळे जंगलातील हिरवळीत रहाणाऱ्या विपुल वन्यजीवांचा नाशही झाला होता. खरंतर वनांतले वृक्ष, प्राणी, पक्षी, कीटक, पतंग आणि फुले या सर्वांचे अस्तित्व हे एकमेकांवर आणि वातावरणावर अवलंबून असते. या पर्जन्य-वनांमध्ये झाडे, प्राणी व पक्षी यांच्यात परस्पर संबंधांची साखळी आहे. सजीव आणि भोवतालचे वातावरण यांच्यातील संबंधांच्या या साखळीला परिसंस्था (इकोसिस्टीम) असे नाव आहे. ॲमेझॉनचे जंगल जरी खूपच विशाल असले, तरी त्यातील पर्यावरण खूपच नाजूक आहे. ते संतुलीत रहाणं आवश्यक आहे. जेंव्हा जंगलाचा काही भाग तोडला जातो तेव्हा हा समतोल लवकर ढासळतो, आणि शेकडो, हजारोंच्या संख्येने वनस्पती आणि प्राणी नष्ट होतात.

ह्या जंगलांचा ऱ्हास होणे हा केवळ वन्यजीवांसाठीच धोका नाही. यामुळे रबर गोळा करणाऱ्यांच्या पोटावर पाय येतो, इतकेच नव्हे तर ॲमेझॉनला वाचवण्याच्या मोहिमेदरम्यान चिको मेंडिस यांच्या लक्षात आलं ते हे, की बारमाही पावसाचं हे पर्जन्य-वन (रेन फॉरेस्ट्स) नष्ट झाल्याने संपूर्ण पृथ्वीच्या वातावरणाला धोका निर्माण झाला आहे. १९८६ च्या त्या उन्हाळ्यातल्या त्या दिवशी चिको मेंडिस बरोबर जाणाऱ्यांची मुख्य चिंता पृथ्वीच्या भवितव्याबद्दल नव्हती. चिंता होती ती रोजीरोटी कमावण्याचा एकमात्र मार्ग धोक्यात आला आहे ही. चिको मेंडिसने आता उजाडलेला भाग सोडून बिकट आणि वळणाची वाट धरली, जी घनदाट जंगलांकडे जात होती.

त्यांनी दाट जंगलात प्रवेश करताच धगधगणारा सूर्य मागे राहिला. अचानक संध्येची चादर पसरली. जणू हा संधीप्रकाश कायमचाच होता. ते लोक जसजसे पुढे जाऊ लागले तसे आता त्यांनी गाणेही सुरू केले. त्या गाण्यांचे सूर उमटत आणि दाट झाडांच्या हिरवळीत गायब होत. वाटेत त्यांना इतर रबर गोळा करणाऱ्यांची घरे दिसली, जी लाकडी ओंडके आणि गवत यांनी बांधलेली होती. ते तासच्या तास चालत राहिले.

जंगलात, खूप आत पोचल्यावर त्याने साखळ्यांचा (chain) आवाज ऐकला. हा आवाज करवतीचा होता. या करवतीच्या मदतीने जवळपास कोणीतरी झाडे तोडत होते. या लोकांना जंगलाचा हा भाग उद्ध्वस्त करण्यापासून रोखण्यासाठी मेंडिसने ही तुकडी येथे आणली होती. या लोकांना जंगलाचा हा भाग नष्ट करण्यापासून रोखण्यासाठी शांततापूर्ण निषेधाच्या या प्रकाराला "एम्पेट" म्हणतात.

चिको मेंडिसने सर्वांना एकत्र केले आणि आता त्यांना काय करायचे हे समजावून सांगितले. "माझा विश्वास आहे की हे केवळ मूठभर लोक आहेत. आणि ते आपल्या विरुद्ध काही



करणार नाहीत. परंतु आपला हेतू त्यांना शांतपणे सांगायला हवा. आपण आक्रमक होऊन बोलायला नको

आणि त्यांना आपली भीती वाटणार नाही याची काळजी आपण घेऊया."

आजपर्यंत मेंडिसने पावसाच्या जंगलांच्या रक्षणासाठी अनेक सत्याग्रहांचे आयोजन केले होते. मेंडिस केवळ त्याच्या स्वत:च्या राज्यातच नव्हे तर संपूर्ण अमेझोनियामध्ये या संघर्षाचे नेतृत्व करीत होता. (ब्राझीलच्या वायव्य भागात पावसाच्या जंगलाला अमेझोनिया म्हणतात.)

जरी ॲमेझॉनला वाचवण्यासाठी मेंडिस कोणत्याही प्रकारच्या हिंसाचाराच्या विरोधात असले तरी ज्या लोकांना त्यांनी विरोध केला ते शांतताप्रिय नव्हते. त्यांनी डिसेंबर १९८८ मध्ये चिको मेंडिस यांची हत्या केली. ज्याने नेहमी अनुयायांना अहिंसक मार्गाने जाण्यासाठी प्रेरित केले, तो मारला गेला, कारण तो जंगले वाचवण्याचा प्रयत्न करीत होता.

चिको मेंडिसच्या मृत्यूच्या वेळेस त्याचा संघर्ष, त्याची चळवळ दक्षिण अमेरिकेच्या पर्जन्य-वनांच्याही बाहेर सर्व दूर पसरली होती. त्यांच्या प्रयत्नांमुळे पर्यावरणाची चिंता करणारे सर्व लोक वनसंवर्धनाच्या या मोहिमेमध्ये सामील झाले होते.

"आम्ही रबराची झाडे आणि जंगलातली आपली जीवनशैली वाचविण्यासाठी हा संघर्ष सुरू केला." ते म्हणाले. "मग आम्हाला समजले की आम्ही याद्वारे संपूर्ण अमेझोनियाचे संरक्षण करीत आहोत."

"पण आता मला वाटतंय की आपण संपूर्ण मानवजातीसाठी लढा देत आहोत," चिको मेंडिस ने म्हटलं होतं.

## प्रकरण २ ॲमेझॉनचे पावसाचे जंगल

ॲमेझॉनचे पावसाचे जंगल, (रेनफॉरेस्ट) अथवा पर्जन्य-वन इतके मोठे आहे! अंदाज घ्यायचा असेल तर भारतभर पसरलेल्या मोठ्या जंगलाची कल्पना करा. पण नाही, हे पर्जन्य-वन त्यापेक्षाही मोठे आहे. त्यात भारतासारखे दोन देश मावतील. म्हणजे किती? तर चोवीस लाख चौरस मैलांपेक्षाही जास्त. म्हणजे ६२ लाख चौरस किलोमीटर.

आकाशातून पाहिले तर हे पर्जन्य-वन असीमित हिरव्या गालिचासारखे दिसते. वास्तविक हे ॲमेझॉनचे पर्जन्य-वन जैविक विविधतेने परिपूर्ण आहे. इतकं की त्याची कल्पनासुद्धा करता येणार नाही. येथे तापमान नेहमीच जास्त असते, पाऊसही खूप म्हणून आर्द्रता देखील खूप जास्त असते. यामुळे तिथे असं वातावरण झालं आहे की ज्यात झाडे आणि प्राण्यांच्या हजारो प्रजाती पोसल्या जातात व त्यांची भरभराटही होते.

ॲमेझॉनच्या पर्जन्य-वनाच्या उबदार व ओलसर वातावरणात पन्नास हजाराहून अधिक प्रजातींची झाडं अस्तित्वात आहेत. ॲमेझॉन नदी आणि तिच्या उपनद्यांमध्ये तीन हजारांहून अधिक प्रकारचे मासे आढळतात. या जंगलात शास्त्रज्ञांना अवघ्या दोन एकर क्षेत्रात छोट्या छोट्या भागात २३० पेक्षा जास्त प्रजातींची झाडे आढळली. दहा चौरस फूट क्षेत्रात सडलेल्या पानांच्या खाली ५० प्रकारच्या मुंग्या आढळल्या, तिथले एकच झाड ४०० पेक्षा जास्त कीटकांना आधार देते.

या पर्जन्य-वनात, व्हायलेट्स जातीची झाडे ३० फुटांपेक्षा जास्त वाढतात आणि सात फुटांपेक्षा जास्त रुंद कमळांची फुले (वॉटर लिली) सापडली आहेत. येथे आठ इंच लांब पखांसह, चमकदार निळी फुलपाखरे आणि बाळाच्या मुठीपेक्षा मोठ्या भृंगांसह, सापांसारखे कल्ले असणारे सुरवंट रेंगाळताना दिसतात. पिरारकू नावाचे मासे सात फूट लांब वाढतात. यापैकी बऱ्याच वनस्पती आणि प्राणी असे आहेत, जे जगात इतरत्र कुठेही आढळत नाहीत. याचं कारण आहे ॲमेझॉन जंगलातले विशिष्ट उबदार वातावरण. या प्रजाती टिकून राहण्यासाठी त्यांना अशा वातावरणाची गरज असते.



विषुववृत्ताच्या जवळ असल्यामुळे, या पावसाच्या जंगलाला दररोज पूर्ण १२ तास, थेट सूर्यप्रकाश मिळतो.

येथे दररोज सुमारे ८६ डिग्री फॅरेनहाइट (३० डिग्री सेंटीग्रेड) तापमान असते आणि हवा नेहमीच अत्यंत आर्द्र असते. दररोज दुपारी जोरदार पाऊस पडतो, वर्षभरात १०० इंचांपेक्षाही जास्त पाऊस पडतो.

तीव्र उन्हं आणि उष्णता, तसेच पाऊस आणि आर्द्रता, यामुळेच या दाट हिरव्यागार समृद्ध जंगलाला जन्म मिळाला आहे. याचसाठी ॲमेझॉनला पर्जन्य-वन किंवा पावसाचे जंगल म्हटलं जातं. विविध हिरव्या रंगानी रंगलेला हा गालीचाच जणू. गालीचा म्हटलं, तरी प्रत्यक्षात हे जंगल उंच महाकाय वृक्षांनी बनलेले आहे. आणि त्यावर वाढणाऱ्या वेलींची विस्तृत पाने आणि जाड फांद्या, जास्त प्रमाणात सूर्य प्रकाश मिळवण्यासाठी वरच्या बाजूस वाढतात, त्यामुळे पर्जन्य-वनाचा हा वरचा पृष्ठभाग तयार होतो. प्रत्येक वृक्षाचा डेरा वाढून त्याच्या फांद्या व पाने एकमेकात मिसळतात आणि एक छत घातले जाते (त्याला कॅनोपी असे म्हणतात). हे छत ज्या झाडे व वेलींपासून बनले आहे ती झाडे १०० ते १३० फूट उंच आहेत.

जरा जवळून पाहिल्यास हे छत किंवा ही छत्री, सपाट हिरव्या चटईसारखी नाही, तर उंचवट्याने भरलेल्या रानासारखी दिसते. हे उंचवटे म्हणजे अधून मधून वाढलेली झाडं, जी छतापेक्षा अधिक वर गेलेली आहेत. या झाडांना छताच्या वर वाढल्यामुळे त्यांना उठलेली झाडं म्हणतात. ती जंगलसपाटीपासून १८० फूटांपेक्षा जास्त वाढतात.

ॲमेझॉन पर्जन्य-वनामधील बहुतेक सर्व जीवसृष्टीचे रूप या छत्रीमधे दिसते. या छत्रीमधे जंगलातील अनेक प्राणी व वनस्पतींना घर मिळते. छत्रीच्या वरच्या पृष्ठभागावरील गडद रंगांची फुले हवेला गंध देतात. ही फुले व फुलांचे गोड पराग असंख्य फुलपाखरे, मधमाश्या, वटवाघळे आणि पक्षी यांना आकर्षित करतात. एका फुलापासून दुसऱ्या फुलापर्यंत फिरणारे हे वन्य जीव या झाडांचे परागकण पसरविण्यास मदत करतात. या प्रक्रियेचा परिणाम म्हणून फुलांचे रूपांतर फळांमध्ये होते, जे वानर, पोपट आणि जंगलातील काही इतर पक्षी /प्राण्यांचे अन्न असते. झाडांकडून अन्न मिळाल्याच्या बदल्यात जणू हे प्राणी दूरवर जंगलाच्या मातीमध्ये या वनस्पतींचं बियाणं पसरविण्यात मदत करतात, त्यामुळे आणखी नवीन झाडे वाढतात.





या छत्रीमध्ये विविध प्रकारच्या चमकदार रंगांच्या ब्रोमेलीयाडच्या प्रजाती आणि इतर प्रकारच्या हवेत वाढणाऱ्या वनस्पती सापडल्या आहेत. या हवाई झाडांची (epiphytes) मुळे इतर झाडे आणि वेलींचा फक्त आधार घेतात. त्यांची अन्न व पाण्याची बहुतेक गरज हवेतून पुरवली जाते. या हवाई झाडांची फुलं वाटीच्या आकाराची असतात, ती पावसाच्या पाण्याने भरतात आणि मग बेडूक आणि पतंग बऱ्याचदा त्यामध्ये आपली घरं बनवतात.

वर असणाऱ्या या छताखाली, जमिनीपासून सुमारे ५० ते ६० फूट उंचीवर, वनस्पतींचा आणखी एक माळा आहे, ज्यास अंडररेटरी म्हणतात. हा छताखालचा माळा /मजला म्हणजे लाकडासारख्या जाड झाडा झुडुपांचं आणि लिआनां वेलींच जाळं आहे, ज्यामध्ये बरीच लहान झाडे आणि झुडुपे जन्माला येतात. सूर्याचा विखुरलेला प्रकाश मिळविण्यासाठी या वनस्पतिंची एकमेकांशी स्पर्धा असते, त्या वनस्पति वरच्या छत्रीच्या तळाशी देखील जगतात आणि वाढतात. या पाऊस-जंगलाचा सर्वात खालचा थर हा जंगलाच्या मातीवर आहे, या मातीत पडलेल्या पानांचे विघटन होत असते. पडलेल्या झाडांच्या फांद्या खोडांसारखे भागही कालांतराने कुजल्याने जमीन सुपीक आणि स्पंजासारखी भुसभुशीत बनलेली आहे. सूर्याचा थेट प्रकाश महत्प्रयासाने जेमतेम तेथे पोहोचतो. कमी प्रकाशात वाढणाऱ्या काही तुरळक जाती सोडल्या तर येथे कोणतीही हिरवीवनस्पती दिसत नाही. कधीकधी एखादा महाकाय वृक्ष पडतो तेव्हा त्याठिकाणी





सूर्यप्रकाश तळाशी पोहोचतो. असा प्रकाश मिळाला की त्या जागच्या छोट्या वनस्पतीं वेगाने वाढतात. अधिक प्रकाश मिळविण्यासाठी उंच वाढलेल्या वनस्पतीं खाली पोचणारा प्रकाश परत बंद करतात.

आश्चर्याची बाब म्हणजे पर्जन्य-वनाच्या मातीचा थर बऱ्यापैकी पातळ आहे व जमिनीखालचा बराचसा भाग नापीक आहे. शतकानुशतके मुसळधार पावसामुळे खोल मातीतील सुपीक घटक वाहून गेले आहेत. म्हणूनच येथील वनस्पतींची मुळे देखील खूप खोलवर जात नाहीत, तर ती या सुपीक मातीच्या पातळ थरांना बांधतात, जेणेकरून ती पावसाने वाहून जाऊ नये.

या पर्जन्य-वनाच्या पर्यावरणामध्ये प्रत्येक प्राण्याची आणि वनस्पतीची स्वतःची भूमिका असते. येथे काहीही वाया जात नाही. अस वाटतं की ही परिसंस्था (इकोसिस्टीम) म्हणजे पुनर्वापर करणारा जिवंत कारखाना आहे. प्रत्येक अन्नाचा कण आणि पावसाचा प्रत्येक थेंब हा परत परत तिथल्या सजीव सृष्टीसाठी वापरला जातो.

जेव्हा पर्जन्य-वनात झाडे मरतात, तेव्हा तेथील उष्णता आणि ओलेपणा/ आर्द्रतेमुळे त्यांचे त्वरित विघटन होण्यास सुरवात होते. त्यामधून निर्माण होणारे पोषक घटक लगेचच मातीत मिसळतात, जे इतर वनस्पतींसाठी उपयुक्त ठरतात.

तेथे पडणाऱ्या पावसाच्या पाण्याचाही पुनर्वापर होतो. छत्रीची मोठी पाने आणि त्याखालील फांद्या तळ-मजल्यापर्यंत पोचणाऱ्या पावसाच्या पाण्याचा वेग कमी करतात. पहिल्या पावसाचा, पाण्याचा पहिला थेंब तळापर्यंत पोहोचण्यासाठी १० मिनिटांपर्यंत वेळ लागतो. तीव्र उष्णता आणि सूर्यप्रकाशामुळे, पावसाचे ८० टक्के पाणी बाष्पीभवन होऊन परत हवेत मिसळते.

ह्या वाफेमुळे मोठाले ढग तयार होतात, आणि हे पाणी पुन्हा पावसाच्या रूपाने जंगलावर पडते. पर्जन्य-वनांच्या परिसंस्थेचा (इकोसिस्टीमचा) परिणाम पूर्ण पृथ्वीच्या हवामानावर होतो. या जंगलामुळे तयार होणारे प्रचंड ढग आजूबाजूच्या शेतात पाऊस पाडतात. यापावसामुळे पृथ्वीच्या वातावरणाचे तापमान कमी होते. याव्यतिरिक्त, पर्जन्य-वनातील वनस्पती वातावरणातून कार्बन डाय ऑक्साईड वायू मोठ्या प्रमाणात शोषून घेतात. आणि आपल्याला जीवनावश्यक ऑक्सिजन सोडतात. हवेतील कार्बन डाय ऑक्साईड कमी झाल्यामुळेही पृथ्वीचे तापमान कमी होते.

पावसाच्या जंगलात आढळणाऱ्या विविध प्रकारच्या वनस्पती आणि प्राण्यांचे इतरही फायदे आहेत. अनेक वनस्पती औषधांसाठी वापरल्या जातात. इथे बऱ्याच उपयुक्त वनस्पती असू शकतात, ज्यांची आपल्याला अद्याप माहिती नाही. काही वैज्ञानिकांच्या मते पर्जन्य-वनातील वनस्पतींच्या अर्ध्याहून अधिक प्रजातींचा शोध अद्याप लागलेला नाही.

इतके विशाल जंगल असूनही, पर्जन्य-वनातील परिसंस्था अत्यंत नाजूक आहे. या जंगलात प्राणी व वनस्पतींच्या हजारो प्रजाती आहेत, परंतु वनस्पतींच्या अशाही अनेक प्रजाती आहेत, ज्या केवळ एखादा एकर किंवा अगदी लहान क्षेत्रापुरत्या मर्यादीत आहेत. जर पावसाच्या जंगलाचा एक छोटासा भाग देखील नष्ट झाला तर अनेक जातींच्या वनस्पती आणि जीव नष्ट होण्याचा धोका आहे.



जेव्हा जंगले तोडली जातात तेव्हा झाडे आणि मुळे
मातीच्या उथळ थरांना बांधू शकत नाहीत. मुसळधार
पावसामुळे मातीची धूप होते, ती वाहून जाते आणि
केवळ निर्जीव खडकाळ जमीन बाकी राहते. जंगल
आणि माती लुप्त

झाल्यावरपावसाळ्याचे पाणी धरून ठेवण्यासाठी काहीच उरत नाही, त्यामुळे पावसाळी मोसमामध्ये पडणारं पाणी शेकडो वर्ष जुन्या जमिनीचे अधिक नुकसान करू शकते.

वैज्ञानिकांच्या हे आता लक्षात आले आहे की जंगलं कमी झाली की इतर भागातही पाऊस कमी आणि गरमी जास्त होते. याव्यतिरिक्त, हजारो एकर जंगलं जाळून नष्ट केली तर वातावरणात कार्बन डाय ऑक्साईडचे प्रचंड उत्सर्जन होते हा वायू सूर्यापासून मिळालेली उष्णता शोषून घेतो, जी वातावरणात परत फेकली जात नाही. त्यामुळे पृथ्वीचे तापमान अधिकच वाढते, याला ग्रीनहाऊस इफेक्ट असे नाव देण्यात आले आहे. यालाच ‘ग्लोबल वॉर्मिंग’ म्हणतात.

पर्जन्य-वने नष्ट झाल्यामुळे अन्न किंवा औषधासाठी उपयुक्त अशा किती मौल्यवान वनस्पती नामशेष होत आहेत याचा वैज्ञानिकांना अंदाज बांधणे कठीण आहे. पावसाच्या जंगलांची ही परिसंस्था लाखो वर्षांपासून विकसित झाली आहे. आधी सांगितल्याप्रमाणे विशाल असली तरी ही परिसंस्था नाजूक आहे. ही पर्जन्य-वने त्याला हात न लावता अशीच सोडली तरी ती सतत वाढत जातील. (शाश्वत विकास होईल) पण गेल्या ४०० वर्षांपासून ती आपण अशीच सोडली नाहीत. आज ॲमेझॉनची परिसंस्था धोक्यात आली आहे. त्यात सर्वात मोठा धोका आहे ब्राझीलला. ब्राझील दक्षिण अमेरिकेतील सर्वात मोठा देश आहे आणि चिको मेंडिस यांचाही.

## प्रकरण 3 : रबर गोळा करणाऱ्यांचा इतिहास

दहा हजार वर्षांपासून, ब्राझीलमध्ये फक्त रेड इंडियन लोक राहत होते. सुमारे ५० लाख रेड इंडियन संपूर्ण प्रदेशात पसरले होते. जंगलांतले हे आदिवासी त्यांच्या भूमीशी, निसर्गाशी एकरूप होऊन सुसंगतीने राहत होते. ते शिकार करत, मासे पकडत आणि जंगलांमधून फळे आणि काजू गोळा करत. त्यांनी पाऊस पडल्यावर साधारण कस असलेल्या जमिनीतसुद्धा शेती करण्याचे तंत्र विकसित केलं होतं. हे रेड इंडियन जंगलाच्याच पर्यावरणातील एक भाग बनले होते.

१५०० सालच्या सुमारास पोर्तुगालमधील काही लोक शोध मोहिमेवर दक्षिण अमेरिकेत दाखल झाले. त्यांनी ब्राझीलवर आपला हक्क सांगायला सुरवात केली. पोर्तुगालहून येथे आलेले लोक त्यांच्याबरोबर त्यांची भाषा, चालीरीती, त्यांच्या श्रद्धा असं सगळं घेऊन आले. ब्राझीलमधल्या गोऱ्या लोकांची संख्या १७९० च्या दशकात वेगाने वाढली. त्या काळात हजारो पोर्तुगीज लोक खाणींच्या शोधात, सोनं मिळेल या आशेने देशाच्या आतील भागात गेले.

मग या पोर्तुगीज लोकांना समजले की सोन्यापेक्षाही या जंगलात आणखी कितीतरी मोठा खजिना आहे, जो मिळवायला सोपा आहे. हा खजिना म्हणजे ब्राझिलियन काजू, कोको आणि दालचिनी होय. ही उत्पादने काढण्यासाठी त्यांनी मोठ्या बागांची निर्मिती केली. यामुळे येथील मूळ रेड इंडियन लोकांना परदेशातून येऊन आता मालक झालेल्या लोकांकडे गुलाम म्हणून काम करण्याची वेळ आली. परदेशी लोकांच्या बरोबर आलेल्या साथीच्या रोगांमुळे, आजारांमुळे मोठ्या प्रमाणात रेडहेड्स ठार झाले. याशिवाय गुलामगिरीचं खडतर, कठीण आयुष्यदेखील त्यांचे जीव घ्यायला कारणीभूत ठरले.

पोर्तुगीज आणि रेड इंडियन यांच्यात शत्रुत्व असलं तरी, रेड इंडियन्सची जीवनपद्धती बघून पोर्तुगीज लोकांना जंगलांची चांगली माहिती झाली. त्यांनी मासेमारी आणि शिकार करणे, तसेच कोणती झाडे कोणती फळे, बिया देतात हे जाणलं. कोणत्या औषधी वनस्पती जखमांना बरं करण्यास आणि रोग बरे करण्यास फायदेशीर ठरतात हे देखील ते शिकले. रबराच्या झाडापासून चीक गोळा करणे आणि त्यापासून जलरोधक वस्तू बनविणे देखील ते शिकले.

रेड इंडियन लोकांनी पोर्तुगीजांना पर्जन्य-वनाच्या मातीचे नुकसान न करता शेती कशी करावी हे शिकवले. ब्राझीलमधील मूळ लोक शतकानुशतके अशा प्रकारे शेती करीत होते. ते प्रथम जंगलातल्या जमिनीचा एक छोटा तुकडा साफ करीत, जेणेकरून जंगलाचे अत्यल्प नुकसान होईल. मग ते कापलेली झाडे झुडपे त्याच जमिनीत जाळत. जेणेकरून झाडातले पोषकद्रव्य पुन्हा मातीत जाई.

ह्या सुपीक झालेल्या मातीत दोन किंवा तीन वर्षांनंतर लागवड केली जात असे.

माती नापीक होण्याआधी तिचा वापर थांबवत. मग आजूबाजूच्या जंगलातील झाडांच्या बिया येथे पडून नवीन झाडे व वेली वाढू लागत. आणि त्या जमिनीचे वनीकरण होऊन जंगल पुन्हा परत तयार होत असे. अशा प्रकारे जंगलाचे पुनर्वसन केलेल्या जागेस पुनरुज्जीवित वन म्हणतात. परदेशात नवीन रबर उत्पादनांची मागणी जसजशी वाढत गेली तसतसे व्यापारी आणि उद्योगपती यांची पर्जन्य-वनात घुसखोरी वाढू लागली. त्यांनी रेड इंडियन लोकांना जबरदस्तीने रबर पुरवण्यास भाग पाडले. मग १८०० च्या उत्तरार्धात आणि १९०० च्या सुरुवातीच्या काळात, मोटारगाड्यांच्या



वाढत्या लोकप्रियतेमुळे रबर टायर्सना प्रचंड मागणी निर्माण झाली. रबर उद्योगाला वेग आला. ॲमेझॉनच्या जंगलात खोलवर, रबर व्यापाऱ्यांनी अफाट वसाहती स्थापन केल्या, ज्याला सेरींगल (एकवचन) असं नाव आहे. हा सगळा कारभार पहाण्यासाठी जे व्यवस्थापक नियुक्त केले गेले त्यांना सेरिंगलिस्टास म्हणत. ॲमेझॉनच्या जंगलात रस्ते नसल्यामुळे, या रबर इस्टेट्स किंवा सेरींगाइस (अनेकवचन) बहुतेककरून एखाद्या नदीच्या जवळ बांधल्या गेल्या.



हे रबर बोटीनं मोठ्या शहरांच्या बाजारपेठेत पाठविलं जात असे. रबराची वाढती मागणी पूर्ण करण्यासाठी सेरींगाइसच्या मालकांनी ब्राझीलच्या पूर्वेकडील गरीब मजुरांना ॲमेझॉनमधे आणले. त्यांना सेरींगुइरोस म्हणत, हे लोक कामाच्या शोधात जंगलात येत असत, रबर गोळा करण्याचं (टॅपर्सचं) काम करीत आणि रेड इंडियन्सप्रमाणे, अन्यायकारक व्यवस्थेचे गुलाम बनत.

टॅपर्सना इस्टेट मालकांकडून त्यांना लागणाऱ्या आवश्यक वस्तू जबरदस्तीने खरेदी करायला लागत. शिवाय त्यांना या मालकांना घर भाडे देणे भाग पडे. अशाप्रकारे, हे रबर टॅपर्स काम करण्यास सुरुवात करण्यापूर्वीच कर्जात बुडायचे. कर्जाची परतफेड होईपर्यंत त्याला सेरींगल सोडण्याची परवानगी नव्हती. त्यांना त्यांचे रबर मालकांना विकावे लागे, परंतु या व्यवहारात त्यांची फसवणूक होत असे. इतके कष्ट करूनही अन्न, भाडे आणि इतर वस्तूंसाठी पैसे दिल्यानंतर त्यांच्याकडे जवळपास काही उरत नसे.

अशीच परिस्थिती होती एकर या गावी, जेंव्हा चिकोचे आजी- आजोबा त्या गावी पोचले. इतरांप्रमाणेच जोस आणि मारिया अल्व्हस मेंडिससुद्धा चांगल्या आयुष्याच्या शोधात तेथे पोचले.

त्यांच्या या शोधापाई त्यांना ॲमेझॉन नदी ओलांडून २००० मैल लांब पल्ला गाठावा लागला होता. परंतु इथले जीवन ते सोडून आलेल्या जीवनापेक्षा काही चांगले नव्हते. जोस रबर टॅपर बनला. त्याचे कुटुंब सांता फे नावाच्या सेरींगल येथे स्थायिक झाले, जेथे जोसने पुढील २० वर्षे काम केले. जेव्हा तो एकर येथे आला, तेव्हा जोसचा मोठा मुलगा फ्रान्सिस्को १२ वर्षांचा होता. तोही आपल्या वडिलांसारखा टॅपर बनला. ईशान्य ब्राझीलमधील बहुतेक लोकांप्रमाणेच फ्रान्सिस्को सडपातळ आणि बारीक होता आणि त्याचे डोळे गडद होते. तो जन्मजात एका पायाने अधू होता, आणि तो लंगडत चालत असे. दिवसभरामधे रबर टॅपरला मैलोनमैल चालायला लागत असे. फ्रान्सिस्कोला ह्याचा खूप त्रास होत होता. तरी त्याने कधीही तक्रार केली नाही, आणि कठोर परिश्रम घेतले.

फ्रान्सिस्को हा एक गंभीर माणूस होता. जंगलात पुस्तकांची उपलब्धता फारशी नव्हतीच, तरी तो वाचायला शिकला. चिकोच्या या वडिलांना राजकीय चर्चा आणि वादविवादात रस होता आणि ते रबर टॅपर लोकांना गुलाम बनवणाऱ्या व्यवस्थेच्या विरोधात बोलताना अजिबात कचरत नसत.

१९४० च्या दशकाच्या सुरुवातीला फ्रान्सिस्कोने इरासी लोपेझ नावाच्या स्त्रीशी लग्न केले. इरासी उंच होती, तिचे केस सुंदर आणि डोळे चमकदार निळे होते. १५ डिसेंबर १९४४ रोजी इरासीने तिच्या पहिल्या मुलाला जन्म दिला. त्याचे नाव फ्रान्सिस्को अल्वेस मेंडिस फिल्हो ठेवले गेले, पण त्याचे आई वडील त्याला चिको म्हणून हाक मारत. त्याच्या सात भावंडांपैकी सर्वात मोठा हा चिको, जंगलात झ्यापुरी शहरालगत असलेल्या सेरिंगल कचोइरा येथे वाढला. त्याचे कुटुंब रबर गोळा करण्याच्या भागात (कोलोकस्सो) राहत होते. या भागाला बोम फ्युटोरो असे ही म्हणत. पोर्तुगीज भाषेत याचा अर्थ 'सुंदर भविष्य' असा होता. इतर रबर टॅपर्सप्रमाणे, तो एक स्वावलंबी जीवनशैली जगला. आजही टॅपर्सचे जीवनमान जवळजवळ तसंच आहे.

मेंडिस कुटुंब सुमारे ७०० एकर क्षेत्रावर रबर गोळा करीत असे. त्याच्या कोलोकस्सोच्या मध्यभागी त्याचे घर आणि त्याभोवती काही मोकळे रान होते. घराभोवती अनेक वळणावळणाच्या पायवाटा होत्या ज्या रबराच्या झाडांकडे जात होत्या. त्याचे घर ‘तापीरी’ एक छोटी आयताकृती इमारत होती. हे एक-मजली घर जमिनीपासून



तीन फूट उंचीवर तयार केले गेले होते जेणेकरून सरपटणारे कीटक व इतर प्राणी आत येऊ नयेत. हे घर पाश्यियुबा पाम लाकडापासून बनविलेल्या भक्कम खांबावर उभे होते. पाश्यियुबा पाम लाकडाचा उपयोग घराच्या छतावरील आणि भिंतींसाठीही केला जात असे.

घराची फरशी पाश्यियुबाच्या लहान झाडांच्यापासून बनवलेल्या ठोकळ्यांनी बनविली होती. या फळ्यांमध्ये थोडे अंतर ठेवण्यात आले होते. जेणेकरून पावाचे तुकडे किंवा तांदूळ वगैरे त्या फटीतून खाली जमिनीवर पडे. अशा प्रकारे घराची लादी स्वच्छ राहत असे आणि डुक्कर, कोंबडीची व बदके यासारख्या पाळीव प्राण्यांनाही घराखाली भटकंती केली की खायला मिळत असे. जंगलाप्रमाणे रबर टॅपर्सच्या घराच्या आयुष्यातही काही वाया गेले नाही. त्या घरात एक व्हरांडा, जेवणाची खोली आणि काही झोपायच्या खोल्या होत्या. अधिक लोकांच्या झोपेची व्यवस्था बऱ्याचदा जाळीदार झोपे किंवा टांगता बिछाना



व्हरांड्यात बांधून केली जात असे. घराचं छप्पर हे पामच्या झावळ्यांनी किंवा विणलेल्या चटईने शाकारलेले असे.

घराच्या एका कोपऱ्यात स्वयंपाकघर बांधले गेले होते, जेणेकरून चुलीत लाकूड जाळताना उष्णता आणि धूर संपूर्ण घरात पसरू नये. स्वयंपाकघरात एक लाकडी ओटा होता, त्याच्या बाजूला डिश धुण्याचे काम केले की पाणी खाली जमिनीवर जाई त्यामुळे झालेल्या चिखलात बदकं आणि डुक्करं खेळत असत.

त्याचं कुटुंब घराच्या सभोवतालच्या मोकळ्या जमिनीवर सोयाबीन आणि तांदूळ इत्यादी पिकवत असे, रेड इंडियन्सनी काही शतकांपूर्वी पोर्तुगीज अभ्यागतांना शिकवलेल्या शेतीच्या त्याच पद्धतींचा ते वापर करत. ते जवळच्या जंगलात शिकार करून किंवा फळं आणि खाद्यबिया गोळा करीत असत.

तो लहान असताना, चिकोची दिनचर्या रबर टॅपर्सच्या इतर मुलांसारखीच होती. पाऊस-जंगलात बालपणाचा काळ मित्र मैत्रिणींबरोबर मजा करण्याचा नव्हता. अगदी लहान मुलांनाही दिवसभर कष्ट करावे लागत.

जेव्हा चिको पाच वर्षांचा होता तेव्हाही त्याला बरेच काम करायचे असे, खेळायला फारच कमी वेळ मिळे. दररोज त्याला नदीवरून पाणी आणावं लागे. एका मोठ्या टाकीत ते पाणी साठवत असत. मग त्याला चुलीसाठी लाकडंही गोळा करावी लागत. त्यानंतर त्याला बागेतून ताज्या भाज्या आणणं आणि बागकाम



करणं, हेही करावं लागे. रबर टॅपर्सच्या मुलांच्या बालपणाचा काल फारच कमी असे. तो नऊ वर्षांचा झाला तेव्हा पाणी किंवा लाकूड आणण्याची जबाबदारी चिकोवर राहिली नाही. त्याच्याकडून ही कामे आता लहान भावंडांकडे गेली. आता त्याच्यावर मोठ्या माणसांच्या कामाची जबाबदारी आली. आता चिकोवर त्याच्या वडिलांबरोबर रबर टॅपरचे आयुष्य सुरू करण्याची वेळ आली होती.

**"मी पर्यावरण हा शब्द ऐकण्यापूर्वीच, खूप पूर्वी एक पर्यावरणशास्त्रज्ञ बनलो."**

## प्रकरण ४ : रबर टॅपरचे आयुष्य

केवळ नऊ वर्षांच्या चिकोसाठी सकाळी लवकर उठणे खरं तर सोपे नव्हते. परंतु पर्जन्य-वनात मुलांसाठी आयुष्य सोपे नसेच. "माझे जीवन इतर रबर टॅपर्सप्रमाणेच सुरू झाले, मालकाची आज्ञा पाळण्यास बांधील असलेल्या गुलामांप्रमाणेच." चिको सांगत असे, "मी नोकरी सुरू केली तेव्हा मी फक्त नऊ वर्षाचा होतो. माझ्या वडिलांप्रमाणे त्या वयातही मी लिहावाचायला शिकण्याऐवजी रबराच्या झाडापासून चीक गोळा करण्यास शिकत होतो."

१९०० सालाच्या तुलनेत टॅपर्सच्या स्थितीत थोडीफार सुधारणा झाली असली तरीही, या रबर मळयांच्या वसाहतींमध्ये शाळा नव्हत्या. "वसाहतींच्या मालकांनी शाळा उघडण्यास परवानगी दिली नाही." चिको विषादाने सांगे. "कारण जर रबर टॅपर्सची मुलं शाळेत गेली तर ती लिहावाचायला आणि गणितही शिकतील आणि त्यांना आपण किती फसवले गेलो आहोत हे लवकरच समजेल.

थोडक्यात काय की दररोज सकाळी, कोंबडा आरवण्यापूर्वी, चिकोला उठावं लागे. तो आणि त्याचे वडील नाश्त्याला दलिया आणि दाट काळी कॉफी घ्यायचे. अजूनही जंगलावर काळोखाचे साम्राज्य असतानाच ते घराबाहेर पडायचे.

नेहमी लागणारी साधनं ते बरोबर घेत. रबराच्या झाडाला छेद देणारा चाकू, (फाका डी सेरींगा) वाटेत पडलेल्या झाडाच्या फांद्या तोडण्यासाठी वापरला जाणारा मॅचेट, रबराचा चीक गोळा करण्यासाठी वाडगे आणि बादल्या याशिवाय जंगलात नेहमीच आढळणारी फळे आणि बिया गोळा करण्यासाठी मोठ्या पिशव्या.

फ्रान्सिस्कोने दिव्याची वात पेटवली, त्या दिव्याला पोरोंगा म्हणत. पोरोंगाच्या पुढच्या भागाकडे वात असे, ती मातीच्या तेलात बुडवलेली असे. त्याच्या मागच्या भागात आरसा होता. वात पेटवली की त्यावरून प्रकाश परावर्तीत होत असे. पोरोंगाच्या प्रकाशामुळेच त्यांना जंगलातल्या धूसर पायवाटेवर चालताना दिसत असे. (आजचे रबर टॅपर्स बॅटरी फ्लॅशलाइट वापरतात.)

फ्रान्सिस्को आणि चिको शांतपणे, परंतु झटपट आपले काम सुरू करत. जंगलात अनेक पायवाटा काढलेल्या असत. एका वाटेवर साधारणत: २०० रबराची झाडे असत, जी एकमेकांपासून १०० यार्ड अंतरावर असत, म्हणजे जवळपास फुटबॉलच्या मैदानाएवढी. रबर टॅपर्सना सकाळी लवकर प्रत्येक झाडावर पोचणे आवश्यक असे, कारण यावेळी चीक सहज बाहेर पडतो.

वडिलांच्या बरोबरीने चालायचे म्हणून लहान चिको शक्य तितक्या वेगाने चालत होता. फ्रान्सिस्को लंगडत चाले, तरीही जंगलाच्या वेड्या वाकड्या वाटेने तो भरभर चालत होता. वडिलांच्या मागे चालत असताना चिको खूप काळजी घ्यायला शिकला होता. वाटेतील तुटक्या फांद्यांमध्ये पाय अडखळून पडण्याची, तसेच जाड वेलींमध्ये पाय अडकण्याची भीती असे. फ्रान्सिस्कोने जंगलात कोरड्या पानांखाली बहुतेक वेळा लपलेले विषारी साप आणि कीटकांपासून सावध रहायला चिकोला शिकवले होते.

परंतु त्या जंगलात राहणाऱ्या रेड इंडियन लोकांनी तेथे येणाऱ्या पोर्तुगीजांना शिकवली ती सर्वात महत्वाची गोष्ट चिकोने आपल्या वडिलांकडून शिकली ती म्हणजे निसर्गाशी संवाद साधणं, निसर्गाशी एकरूप होणं. जंगलाच्या नियमांनुसार जगायला शिकणं. "मी पर्यावरणशास्त्रज्ञ हा शब्द ऐकण्यापूर्वी खूप पूर्वी एक पर्यावरणशास्त्रज्ञ बनलो होतो," चिको एकदा म्हणाला होता



रबर टॅपरला जंगलजीवनातील नाजूक समतोल समजणे, आणि तो राखणे फार महत्वाचे होते. जंगल त्यांच्या उपजीविकेचा आधार आहे. म्हणूनच जंगलातील वातावरण निरोगी आणि संतुलित राहावे यासाठी आपल्या जगण्याच्या शैलीत बदल करणे हे महत्वाचे होते. म्हणून रबर टॅपर्स दररोज त्याच झाडावरुन चीक काढत नसत. त्याऐवजी ते दररोज वेगळ्या पायवाटेवर जात, जेणेकरून आधीच्या झाडांना त्यांचं झालेलं नुकसान, झालेली जखम भरून यायला वेळ मिळेल. अशा प्रकारे झाडांचे आरोग्य कायम राहील आणि त्याच्यातून परत चीकही काढता येईल.

उपजीविका जंगलाच्या आरोग्यावर अवलंबून असल्यामुळे, सर्व टॅपर्स रबराच्या झाडाचा खूप आदर करतात. चिकोचा चुलतभाऊ सेबॅस्टिओने टॅपर आणि रबर ट्री यांच्यातील हा खास संबंध स्पष्ट केला. "वर्षानुवर्षे, रबराचे झाड आईसारखेच आपले पालनपोषण करते," सेबस्टिओ म्हणाला. "त्याचे ‘दूध’ आमच्या रक्तासारखे आहे. आम्ही झाडं तोडत राहतो, आणि ती आम्हाला ‘दूध’ देत राहतात. दरवर्षी ती आम्हाला खूप देतात, आमची उपजीविका त्यांच्यामुळेच होते आहे."

त्या दिवशी जेव्हा त्यांना पायवाटेवर पहिले रबराचे झाड लागले, तेव्हा फ्रान्सिस्कोने त्याच्याकडल्या चाकूने मऊ सालीत एक व्ही-आकाराची चीर केली. चिकोला माहित होते की चिरेची खोली अगदी बरोबर असणे



आवश्यक आहे. जास्त खोल चिरेमुळे झाडाचे नुकसान होईल आणि जर कमी खोल झाली तर चीक बाहेर येणार नाही. फ्रान्सिस्को आधीच्या चिरेपासून

थोडे वर किंवा खाली एक नवीन चीर पाडी आणि या व्ही-आकाराच्या, याच प्रकाराने त्याने पुढच्या सर्व झाडांवर चिरा केल्या.फ्रान्सिस्कोने चीर करताच त्यातून चिक गळण्यास सुरूवात झाली. चिकोने व्हीच्या टोकाशी अगदी खाली एक वाडगा लावला. उंचीवरच्या चिरेसाठी चिको घरीच बनवलेल्या शिडीवर चढून तेथे वाडगा लटकवत असे. चीक वाडग्यात गोळा होत असे. लगेचच चिको आणि त्याचे वडील १०० यार्ड वर असणाऱ्या पुढच्या झाडापाशी पोचलेले असत.

दुपारपर्यंत, चिको आणि त्याचे वडील वळत जाणाऱ्या वाटेवरून परत पहिल्या जागी पोचत. भात आणि शेंगांची भाजी खाल्यावर ते जंगलात परतत. पुन्हा त्याच पायवाटेवर, भरभर एका झाडावरून दुसऱ्या झाडाकडे जात, ते चिकाने भरलेले वाडगे बादल्यात रिकामे करत. ते वाडगे आणि बादल्या घेऊन परतत.

हे सर्व करुन घरी परतल्यानंतरही त्यादिवसाचे काम संपलेले नसे. अजून चिकावर सोपस्कार करणं बाकी असे. चीक कमावण्यासाठी, जेणेकरून तो खराब होणार नाही याकरिता चिको आणि त्याचे वडील एका चमच्याने लांब दांड्यावर चीक टाकत असत. हा दांडा ते एका चुलीवजा भट्टीवर धरत. त्या चुलीत बियांची टरफलं आणि लाकूड जाळण्यात येई. तो दांडा गोल फिरवत दांड्यावर चिकाचे थर च्या थर चढवले जात तेंव्हा तो फुटबॉल सारखा दिसू लागे. हे काम पूर्ण झाल्यानंतर रात्री, चिको वडिलांच्या पलंगावर चढून आडवा होई. फ्रान्सिस्को त्याला गोष्टी वाचून दाखवत असे. चिकोला वाचणे लिहिणे व शिकण्याची आवड होती.

त्याच्या वडिलांच्या लक्षात आले होते की चिको फार पटकन शिकणारा मुलगा आहे. फ्रान्सिस्कोच्या एका मित्राने सांगितले, "जेव्हा चिको छोटा होता तेव्हा कोणीही कल्पना केली नसती की तो एवढा मोठा माणूस होईल. त्यांना कौतुक वाटे आणि विश्वासच बसत नसे की इतके लहान मूल इतके चांगले कसे वाचू शकते.

१९५६ साल, चिको ११ वर्षांचा होता, तेव्हा तो रबर टॅपर्सच्या कामात पूर्णपणे गुंतला होता. तोपर्यंत फ्रान्सिस्कोने चिकोला लिहिणे, वाचणे आणि जितकी माहिती होती तितकी गणिती अंकमोड शिकवली. जसंजसं स्वतः चिको पुढे वाचणं शिकला, त्याला गणिताचे अधिक ज्ञान आले, त्याच्या लक्षात आले की त्याच्या वडिलांनी त्याला आणखीही काही शिकवले आहे. त्याला हेही समजले की, या कार्यपध्दतीमधल्या बेईमानी विरुध्द वडिलांचा राग आहे. ज्याने रबर टॅपर्सना कर्जातून मुक्त होऊ दिले नाही.

इतर रबर टॅपर्सच्या मुलांप्रमाणेच, कदाचित चिकोनेही आपले संपूर्ण आयुष्य रबर गोळा करण्यामध्ये घालवले असते. पण १९६२ साली चिको जेव्हा १७ वर्षांचा होता, तेव्हा त्याच्या बाबतीत असे काहीतरी घडले, ज्याने त्याच्या जीवनाचा मार्ग बदलून गेला.

एके दिवशी दुपारनंतर चिको आणि त्याचे वडील चुलीवर रबर कमावण्यात व्यग्र होते. त्यावेळेस जंगलातील एक अनोळखी व्यक्ती तिथे आली आणि त्याने चिकोच्या वडिलांशी बोलण्यास सुरवात केली. त्याचा पोशाख जरी रबर टॅपरप्रमाणेच होता, तरीं इतर रबर टॅपर्सप्रमाणे तो सडपातळ

नव्हता, किंवा त्याचे बोलणं रबर टॅपर्ससारखे नव्हते. विलक्षण गोष्ट अशी होती की त्याच्या खिशात अनेक वर्तमानपत्रे होती, जी ॲमेझॉनच्या सारख्या जंगलात नवलाईची गोष्ट होती. "त्या दिवसांत," चिको यांनी बर्‍याच वर्षांनंतर कबूल केले, "वर्तमानपत्र काय असतं हे देखील मला माहीत नव्हते." युक्लिडस टाव्होरा नावाचा तो माणूस, चिकोच्या वडिलांशी राजकारण आणि सध्याच्या घटनांविषयी बोलत होता. त्या दोघांची चर्चा ऐकून, टाव्होराला पर्जन्य-वनाबाहेरच्या जगाबद्दल किती माहिती होती हे पाहून, चिकोला मोठा धक्का बसला. ही अनोळखी व्यक्ती किती चांगल्या प्रकारे वाचू शकली हे पाहून तो खूप प्रभावित झाला. टाव्होराने चिकोची वाचन क्षमता सुधारण्यास मी मदत करेन अस कबूल केले. चिकोने त्याच्या वडिलांकडे परवानगी मागितली. टाव्होरा तिथून निघताना फ्रान्सिस्कोने चिकोला येणाऱ्या शनिवारी दुपारी टाव्होराकडे जाण्यास परवानगी दिली.

पावसाच्या जंगलातून टाव्होराच्या घराकडे जाणारा रस्ता सुमारे तीन तासांचा होता. फक्त पुढील शनिवारीच नव्हे तर पुढील तीन वर्षांसाठी प्रत्येक शनिवारी चिको हा जंगलातला मार्ग पायांखाली घालू लागला. "तो खूप स्मार्ट होता," चिको या नवीन मित्राबद्दल म्हणाला. "तो शनिवार व रविवारी दिवसभर मला शिकवत असे. आम्ही वर्तमानपत्र वाचत असू आणि तो मला सर्व बातम्यांबद्दल तपशीलवार माहिती सांगायचा, आणि जगभरातील कामगारांच्या संघर्षाबद्दल सांगायचा."

चिको आणि टाव्होरा रेडिओवरील बातम्या देखील ऐकत असत आणि जगात घडणार्‍या घटनांबद्दल रात्रभर चर्चा करत. टाव्होराने रबर टॅपर्सच्या हलाखीची स्थिती बदलण्याकरता चिकोला काहीतरी करण्यास प्रेरित केले. आपल्या संपर्काच्या शेवटच्या दिवसांदरम्यान झालेल्या संभाषणात टाव्होरा यांनी चिकोला सांगितले की रबर टॅपर्सच्या हिताचा जराही विचार न करणारी ही व्यवस्था बदलली जाऊ शकते,

टाव्होरा म्हणाला, “परंतु ती एकट्याने करणे शक्य नव्हते. सर्व टॅपर्सना एकत्र येऊन एक मजबूत संघटना तयार करावी लागेल, ज्याला कामगार (युनियन) संघटना म्हणतात.” चिको म्हणाला, “तोपर्यंत त्यांनी मला थांबून अभ्यास करायला सांगितले."

१९६५ मध्ये, चिकोच्या आईचा प्रसूतीदरम्यान मृत्यू झाला. याव्यतिरिक्त, चिकोचा भाऊ रेमुंडो, जो चिकोसारखाच टॅपर होता, गोळी लागून अपघातात मरण पावला. पिकाची काळजी घेण्यासाठी आता चिकोच्या वडिलांना घरीच राहण्याची गरज होती. आता पायवाटांवरून रबर गोळा करण्याचे काम फक्त एकट्या चिकोवर आले. त्याला आता टाव्होराच्या घरी जाण्यासाठी वेळ मिळत नव्हता. त्यामुळे ही मैत्री पुढे जाऊ शकली नाही. पण टाव्होराचा चिकोच्या जीवनावरील पडलेला प्रभाव म्हणजे नवी सुरुवात होती.

**"आमच्या आदर्शांमुळे आम्ही यात सामील आहोत आणि आम्ही कधीही माघार घेऊ शकणार नाही."**

## प्रकरण ५: विनाशाची सुरूवात

टाव्होराशिवाय चिकोला त्याच्या आयुष्यात काहीतरी अपूर्ण आहे असे वाटू लागले होते. परंतु त्याने टॅपर्सच्या भल्यासाठी काम सुरू केले. त्याने इतर सेरींगुइरोसना लिहायला व वाचायला शिकविण्यास सुरुवात केली. "त्यांना सर्वांना शिकायचे होते," मेंडिस म्हणाले, "कारण त्यांची किती फसवणूक होत आहे हे त्यांना स्पष्टपणे दिसत होते."

नव्या आत्मविश्वासाने मेंडिस यांनी ब्राझीलच्या राष्ट्राध्यक्षांना पत्र लिहिले. त्यांनी तक्रार दिली की रबर जागीरांचे मालक टॅपर्सची फसवणूक करीत आहेत. रबर टॅपर्सच्या मुलांना शाळेत जाण्याची परवानगी नाही आणि कोणी आजारी पडलं तर त्यांच्यासाठी रुग्णालये नाहीत वा कोणतीही सोय नाही.

मेंडिसने एकामागून एक अनेक पत्रे लिहिली पण कधीच उत्तर मिळाले नाही. चिको मेंडिस यांनी विचार केला की जर आपल्याला काही बदल हवा असेल तर तो आपल्याला स्वतःलाच करावा लागेल. आणि त्याची सुरुवात स्वतःच्या सेरींगल पासून करावी लागेल. अशा प्रकारे रबर टॅपर्सच्या स्थिती सुधारण्याच्या धडपडीची सुरुवात सेरिंगल कचोइरापासून झाली मेंडिस रबर टॅपर्सना संघटीत करण्यास उत्सुक होते. पण प्रत्येक टॅपरला सर्वकाही एकट्याने करण्याची सवय होती आणि एकत्र कसे काम करावे हे त्यांना समजू शकले नाही.

"सन १९६८ मध्ये मी रबर टॅपर्सची एक संघटना स्थापन करण्याचा प्रयत्न केला," मेंडिस म्हणाले, "परंतु त्यावेळी वेगवेगळ्या समस्या उद्भवल्या. लोक जागृत नव्हते. लोकांना त्याकडे आकर्षित करणे खूप कठीण होते." परंतु अशा काही घटना घडत होत्या, ज्यामुळे बऱ्याच लोकांचे, जगभरातील लोकांचे, लक्ष लवकरच रबर टॅपर्सकडे आकर्षित होणार होते.

१९६९ साली, ईशान्य ब्राझीलमधील सुमारे ३० दशलक्ष लोक अत्यंत दारिद्र्यात, दाटीने झोपडपट्टीत राहत होते. या समस्येचे निराकरण करण्यासाठी सरकारने शहरी कुटुंबांच्या पुनर्वसनासाठी एक मोठी योजना सुरू केली. या "राष्ट्रीय ऐक्य कार्यक्रमाचा" उद्देश ब्राझीलच्या पूर्वेकडील शहरातील कुटुंबांना पर्जन्य-वनाच्या जंगलाच्या मध्यभागी असलेल्या सदूर-पश्चिमेकडील भागात पाठविणे हा होता.

लोकांना या बदलासाठी उद्युक्त करण्यासाठी, लोकांनी याचा स्वीकार करावा यासाठी सरकार त्यांना पर्जन्य-वनात लागवडीसाठी जमीनीचा एक तुकडा आणि दोन खोल्यांचे घर देत होते. सरकारने त्यांच्यासाठी शाळा व रुग्णालये बांधण्याचे आश्वासन दिले, तसेच पिके पेरण्यासाठी आर्थिक मदतीची हमी दिली.

याव्यतिरिक्त, सरकार शेत मालकांना जंगल साफ करण्यासाठी आणि पशुपालन करण्यास प्रवृत्त करत होते. या प्राण्यांचे मांस इतर देशांमध्ये विकून ब्राझील अधिक पैसे कमवू शकला, ज्याची त्याला नितांत आवश्यकता होती.

१९६९ मधे, राष्ट्रीय एकत्रीकरण कार्यक्रमाच्या घोषणेपूर्वी ॲमेझॉनचे जंगल हे अतिशय दुर्गम ठिकाण होते. मेंडिस कुटुंब ३५ वर्षांपूर्वी तेथे आले त्यावेळेस होते तसेच. पण १९६९ ते १९७५ दरम्यान बरेच काही बदलले. ॲमेझॉन जंगलातून BR-34 नावाचा महामार्ग (ट्रान्स- ॲमेझॉन) बांधला गेला.

या महामार्गाच्या बांधकामात जसजशी प्रगती होत गेली, तसतसे राक्षसी बुलडोझर जंगल साफ करू लागले, केवळ ओसाड प्रदेश मागे ठेवून. प्रथम, दक्षिण ॲमेझॉनमध्ये वृक्ष तोडणीस सुरवात झाली. लवकरच बीआर ३४ ने मेंडिसच्या राज्यातील एकर गाव गाठले.





या मार्गावरून प्रवास करणाऱ्या हजारो कुटुंबांना पर्जन्यवन परिसंस्थेविषयी काहीच माहिती नव्हती. जेव्हा त्यांनी जंगलातील बराच प्रदेश झाडे कापून आणि जाळून काढला तेव्हा रेड इंडियन्स आणि रबर टॅपर्सप्रमाणे त्यांनी आजूबाजूचे जंगल सुरक्षित राहील ही खबरदारी घेतली नाही. त्यांनी त्या जागेवर शेती करण्यास सुरवात केली, परंतु मातीचे पोषक द्रव्य लवकरच संपेल हे त्यांना ठाऊक नव्हते.

जेव्हा जंगलातील मातीतून पुरेसे पीक मिळणे थांबले तेव्हा त्यांना ती जमीन सोडावी लागली. आणि त्यांनी जंगलाचा दुसरा भाग तोडून तेथे शेती करण्यास सुरवात केली. त्यांनी सोडून दिलेली जमीन तर वाया गेलीच होती आणि ज्या नवीन भूमीकडे ते गेले होते तिथेही काही वर्षांत तीच स्थिति येणार होती.

पर्जन्य-वनाचे हे जे जमिनीचे नुकसान शेतकऱ्यांकडून होत होते, त्यापेक्षाही जास्त नुकसान करणारे कट्टर शत्रू होते पशुधन-राखणारे मालक. मातीची सुपीकता कमी होत असल्याने एका जनावरा मागे चरण्यासाठी एक हेक्टर (सुमारे अडीच एकर) जमीन लागत असे. मोठ्या प्रमाणावर पशुपालन करणारे गुरांना चरण्यासाठी या प्रमाणात त्यांनी जंगलातील अवाढव्य प्रदेश झाडे काढून आणि जाळून उजाड केला.



या पशुपालकांच्या मालकांनी जंगलावर आक्रमण केल्यामुळे कोट्यावधी झाडे तुटून जळून खाक झाली. १९७० ते १९७५ च्या दरम्यान यांत्रिकी करवत चालवणाऱ्या या लोकांनी जबरदस्तीने मेंडिसच्या झ्यापुरी गावात १८०००० रबराची झाडे, ८०००० ब्राझीलियन फळ बियांची झाडे आणि दशलक्षाहूनही अधिक इतर झाडांना आग लावली. यामुळे धुराचे लोटच्या लोट उठत होते. त्याचेच गडद ढग बनून पावसाच्या जंगलावर फिरत होते.



चिको मेंडिस यांनी जाणलं की जंगल आणि रबर टॅपर्सची रोजीरोटी वाचवण्यासाठी वेळ खूपच कमी आहे. जर जंगल संपले तर रबर टॅपर्स देखील उध्वस्त होतील. संघटना स्थापन करण्याचा आणखी एक प्रयत्न करण्याची वेळ आली आहे असे मेंडिस यांना वाटले. "मला माहीत झालं की एक ट्रेड यूनियन स्थापन केली जात आहे," मेंडिस आठवत म्हणाले, "मला टाव्होराचे शब्द आठवले आणि मी निमंत्रणाची वाट न पाहता सरळ तिथे गेलो."



मेंडिस १९७५ मध्ये राष्ट्रीय कामगार संघात दाखल झाले. याच वर्षी त्यांचे वडील वारले. १९७६ मध्ये, ते झ्यापुरीच्या शहर सभेत निवडून गेले. कामगार संघटनेच्या कामकाजामुळे आणि नगरसेवकांच्या जबाबदाऱ्यामुळे, त्याला आता रबर गोळा करण्यास फारच कमी वेळ मिळत असे. आता तो टॅपर्सचा नेता झाला होता. त्याचं टॅपर्स समवयस्कांशी आता वडिलकीच नातं होत. त्यांच्यासाठी तो लढत होता. आणि त्यांना आत्मनिर्भर होण्यासाठी प्रोत्साहन देत होता. १९७६ सालीच चिको मेंडिस यांनी त्यांच्या पहिल्या निषेध मोहिमेचे (एम्पेट) नेतृत्व केलं. मेंडिस आणि त्यांच्या टॅपर साथीदारांच्या एका गटाने जंगलाचा मोठा भाग कापून काढणाऱ्या मजुरांना घेरलं. टॅपर्सनी तीन दिवस हा एम्पेट सुरू ठेवला. शेवटी तिथल्या मजुरांनी आपली अवजारं खाली ठेवून काम बंद केलं आणि तेथून निघून गेले.

टॅपर्स आणि त्यांचे कुटुंबीय हे पशुपालनाला विरोध करत राहिले. जंगलाच्या होणाऱ्या विध्वंसाचा निषेध करत राहिले. बऱ्याच वेळा ३०० पेक्षा जास्त लोक झाडे वाचवण्यासाठी जमत. ते एकमेकांचे हात धरत, मानवी साखळी तयार करत आणि बुलडोझर आणि यांत्रिकी करवत चालवणाऱ्यांसामोर उभे राहत. १३ वर्षात मेंडिसने अशा डझनभर तरी निषेध मोहीमा (एम्पेट) राबविल्या. या मोहिमांमुळे पर्जन्य-वन क्षेत्रातील सुमारे तीस दशलक्ष एकर जमीन वृक्षतोडीपासून वाचली असा अंदाज आहे. "आमची चळवळ शांततामय आहे," मेंडिस म्हणत. "रक्तपात हे आपल्या चळवळीचे मुळीच उद्दीष्ट नाही. या विशाल समस्यांना दृढपणे तोंड देण्यासाठी लोकांमध्ये जागरूकता निर्माण करणे हा या चळवळीचा प्रयत्न आहे."

मेंडिस आणि त्याच्या टॅपर सहकाऱ्यांनी एप्रिल १९७७ मध्ये झ्यापुरीची स्थानिक कामगार संघटना स्थापन केली. "मी या कामगार चळवळीत अधिकाधिक सहभागी होत राहिलो" असे मेंडिस म्हणाले. "माझ्यासाठी सर्वोत्तम गोष्ट म्हणजे ही चळवळ होती." कामगार संघटनेचा प्रभाव वाढताच पशुपालन करणाऱ्यांनी उलटा विरोध करण्याचे ठरविले. हिंसाचार करून त्यांनी हा विरोध दर्शवला. कामगार संघटनेतील लोकांची घरे जाळली गेली. या चळवळीचे समर्थन करणारे नेते आणि इतरांना जिवे मारण्याच्या धमकया येऊ लागल्या. कालांतराने, म्हणजे जुलै १९८० मध्ये, युनियनचे अध्यक्ष आणि मेंडिस यांचे निकटवर्तीय असलेल्या विल्सन पिन्हिरो यांची हत्या करण्यात आली. मेंडिस ने मनोमन जाणलं की जंगल वाचविण्याची ही चळवळ आता धोकादायक झाली आहे. "पिन्हेरोचे जे झाले, हे माझ्या बाबतीतही घडले असते, किंवा घडेल" ते म्हणाले. त्यांना त्याचबरोबर वाटले की हे आंदोलन सुरू ठेवणे आवश्यक आहे

***"आमचे विचार आणि आदर्श यामुळे आम्ही यात उतरलो आहोत, म्हणूनच कधीही मागे हटणार नाही. आमची पाळमुळं इतकी खोलवर आहेत की आम्ही चळवळ सोडून देण्याचा विचारही करू शकत नाही. ही चळवळ मोडून काढायची असेल तर त्यांना आपल्या सर्वांना मारावे लागेल. आता मला मरणाची भीती नाही. मला माहीत आहे ते आपल्याला संपवू शकत नाहीत. आपल्यापैकी कुणीही मारला गेला तरी आंदोलन सुरूच राहील. उलट ते अधिक मजबूत होईल."***

" **"आमचा संघर्ष हा जंगलातील सर्व लोकांचा संघर्षआहे."**

## प्रकरण ६ जंगल वाचवण्यासाठी एकजूट

पशुपालक/मालकांना आशा होती की हिंसाचाराच्या भीतीमुळे चळवळीतील जोर कमी होईल. चळवळ दबली जाईल. पण मेंडिसनी म्हटल्याप्रमाणे आंदोलन अधिक तीव्र झाले.

"तेव्हापासून, झ्यापुरीच्या रबर टॅपर्सनी जंगलतोडीच्या विरोधाचा, संघर्षाचा एक निश्चित मार्ग लोकांना दाखवला," मेंडिस म्हणाले. "झ्यापुरीच्या संघटनेने प्रस्ताव मांडला की प्रथम लोकांना शिक्षण देण्याच काम केले जावे चळवळीत अधिकाधिक लोकांना सामील करण्यासाठी लोक शिक्षित असण गरजेचं होत."

१९७९ साली, कामगार संघटनेने टॅपर्सना वाचायला आणि लिहायला शिकविण्याचा कार्यक्रम सुरू केला. पहिल्यांदाच पर्जन्य-वनातील मुलांसाठी शाळा काढण्यात आल्या.

त्यानंतर १९८० मध्ये संघाने "प्रोजेत सरिंगेओर" (रबर टॅपरचा प्रकल्प) हा शैक्षणिक कार्यक्रम सुरू केला. मेंडिस यांनी स्पष्ट केले की "रबर टॅपर्सना पर्जन्य-वनाची अधिक जवळून माहिती करून देणं, त्या जंगलाविषयी अधिक ज्ञान मिळवून देणे, त्याची परिसंस्था (ecology) समजून घेणं आणि त्याच्या सुरक्षिततेसाठी वचनबद्ध होणं." ह्या गोष्टी त्या कार्यक्रमामध्ये अंतर्भूत असणार होत्या.

मेंडिस यांना कामगार संघटनेची कामे करताना त्यांच्या वैयक्तिक जीवनात मोठी किंमत मोजावी लागली. त्याचे पहिले लग्न आधीच मोडले होते. १९८३ मध्ये, मेंडिस यांनी इल्जामर गडेल्हा या महिलेशी लग्न केले, ते एकमेकांना बऱ्याच वर्षांपासून ओळखत होते. १९८४ मध्ये त्यांच्या मुलीचा, एलेनिराचा जन्म झाला. खूपदा इल्जामरला आपल्या आयुष्यात एकटेपणा वाटे. तिच्या दृष्टीने ते सोपं नव्हतं. ती तिची आठवण सांगे “मी बऱ्याच वेळेस अस्वस्थ असे की, चिको माझ्यासाठी वेळ देत नाही. परंतु जेव्हा त्याने मला त्याच्या कार्याबद्दल तपशीलवार सांगितलं, तेव्हा मला त्याचं कार्य किती महत्वाचं आहे हे समजलं आणि माझी तक्रार दूर झाली."

टॅपर्सचा संघर्ष जसजसा पुढे जात राहिला तसतसे त्यांच्या लक्षात आले की त्यांना आता जंगलासाठी योजनापूर्वक पावले टाकण्याची आवश्यकता आहे. त्यांनी सरकारला हे पटवून देण्याची गरज होती की पर्जन्य-वनाचा योग्य वापर हा भातशेतीसाठी किंवा कुरणांसाठी न करता शाश्वत शेतीसाठी व्हावा.

"जशी चळवळ पुढे सरकत होती तसं आम्हांला समजत होतं की जंगलाचे भविष्य सुरक्षित करण्यासाठी, आम्हांला काही ठोस योजना केली पाहिजे. जमीन वाचवण्याचा काही तरी मार्ग शोधला पाहिजे आणि त्याचवेळी या क्षेत्राची अर्थव्यवस्था विकसित करावी लागेल." चिकोची अशी बिलकुल अपेक्षा नव्हती की ॲमेझॉनची नैसर्गिक संपत्ती अस्पृश्य राहावी.

त्याचबरोबर मेंडिस यांना हे देखील पक्कं ठाऊक होतं की, "संपूर्ण पृथ्वी आणि मानवजातीसाठी धोकादायक ठरू

शकणारी ही जंगलतोड थांबविणं अत्यावश्यक आहे. आमची योजना केवळ जंगल वाचवण्यासाठीच नव्हे तर आर्थिक विकासही या योजनेत समाविष्ट असला पाहिजे."

झ्यापुरीच्या कामगार संघटनेने ऑक्टोबर १९८५ मध्ये ब्राझीलची राजधानी ब्राझिलिया येथे रबर टॅपर्सची राष्ट्रीय परिषद आयोजित करण्याचा विचार केला. या परिषदेत रबर टॅपरने पर्जन्य-वनाच्या भविष्यासाठी योजना तयार करावी अशी संघाची इच्छा होती.

कामगार संघटनांच्या समितीने, ज्यात रबर टॅपर प्रोजेक्ट आणि इतर संस्थांमधील लोकांचा समावेश होता, त्यांनी या परिषदेचा भरपूर प्रचार केला. टॅपर्सची पहिली राष्ट्रीय परिषद घोषित करणारे पोस्टर जंगल.



आणि लगतच्या शहरांमध्ये चिकटवले गेले. हेलिओ मेल्लो नावाच्या टॅपरने हे पोस्टर डिझाइन केले होते.

ENCONTRO
NACIONAL
SERINGUEIR
AMAZÔNIA

समितीच्या सदस्यांनी जंगलात आतपर्यन्त जाऊन सर्व ठिकाणच्या लोकांना या परिषदेविषयी माहिती दिली

ऑक्टोबर १९८५ मधे, ॲमेझॉनमधून रबर टॅपर्सनी ब्राझीलिया गाठली. संमेलनाला जाण्यासाठी त्यांना अमेझोनियाच्या गरम आणि धुळीच्या रस्त्यांवरून अनेक दिवस बसमधून प्रवास करावा लागला. त्यांच्यापैकी बरेच जण पहिल्यांदाच एवढ्या लांबच्या प्रवासासाठी आपल्या गावाबाहेर किंवा शहराबाहेर पडले होते. " मेझोनियाच्या संपूर्ण इतिहासात," मेंडिस म्हणाले, "अशी घटना यापूर्वी कधीही झाली नव्हती."

परिषदेचा पहिला परिणाम म्हणजे राष्ट्रीय रबर टॅपर्स समितीची (Conselho Nasional dos seringueiros) स्थापना. या समितीचे उद्दीष्ट म्हणजे रबर टॅपर्सना संघटित आवाज देणे. रबर टॅपर्सची स्वतःची संघटना झाली. त्याला औपचारिक मान्यता मिळाली. त्यायोगे या परिषदेचे बरेच दूरगामी परिणाम झाले.

समितीची स्थापना झाल्यावर रबर टॅपर्सनी ॲमेझॉनच्या रेड इंडियन लोकांशी मैत्रीची प्रक्रियादेखील सुरू केली. या दोन समाजात वर्षानुवर्षे वैर होतं पण आता दोघांच्याही लक्षात आलं होतं की जर दोघेही जंगल वाचविण्यासाठीच धडपडत आहेत आहेत तर त्यांना एकत्र काम करायला हरकत नाही.

"आम्हाला समजले की आपला आजचा संघर्ष त्याच गोष्टीसाठी आहे," मेंडिस म्हणाले. "रेड इंडियन लोकांचा संघर्षही रबर टॅपर्सप्रमाणेच आहे. आम्ही एकमेकांचे शत्रू नाही. ॲमेझॉनच्या संरक्षणासाठी आम्हाला एकत्र लढावेच लागेल.“"आमचा संघर्ष हा जंगलातल्या सर्व लोकांचा संघर्ष आहे," चिको मेंडिस यांनी जाहीर केले.

रबर टॅपर्स संघटनेच्या कामादरम्यान मेंडिस यांना बातमी मिळाली की सरकारने उर्वरित रेड इंडियन लोकांच्या संरक्षणासाठी कार्यक्रम सुरू केले आहेत. गेल्या ४०० वर्षांत देशातील रेड इंडियन्सची संख्या ४० लाखांवरून घसरून अवघ्या अडीच लाखांवर गेली आहे. रेड इंडियन्सच्या संरक्षणासाठी, ते अजूनही राहत असलेल्या ॲमेझॉनच्या भागाचा नाश रोखण्यासाठी असे कायदे बनवले गेले. या भागांना सुरक्षित विभाग घोषित करण्यात आले.

मेंडिस यांना वाटले की रबर टॅपर्ससाठी देखील असेच उपाय असू शकतात. ज्या ठिकाणी टॅपर्स काम करतात ते भाग संरक्षित केले पाहिजेत. कारण रबर टॅपर्स रबराचा चीक आणि जंगलातील इतर पदार्थ गोळा करून साठवतात. युनियनने एक ठराव करून, या भागांना संकलनासाठीचा सुरक्षित प्रदेश घोषित करावे म्हणून सरकारला प्रस्ताव पाठवला.

"आम्हाला असं वाटलं की अमेझोनियाच्या भूमीचा हा सर्वोत्कृष्ट उपयोग होईल," मेंडिसने सांगितले. "आम्ही रबर टॅपर्स स्वतःला या जागेचे मालक मानत नाही. ही जमीन राज्याची आहे आम्हाला फक्त त्याचा वापर करण्याचा अधिकार मिळाला पाहिजे."

रबर टॅपर्स युनियनने लवकरच इतर देशांच्या संघटनांशी संबंध प्रस्थापित केले. पर्जन्य-वनाचे भविष्य आता आंतरराष्ट्रीय मुद्दा बनले होते.

आता संपूर्ण जगातील लोकांना पर्जन्य-वन नष्ट होण्याविषयी माहिती मिळत होती. असं म्हटलं जात होतं की प्रत्येक सेकंदाला एका फुटबॉलच्या मैदानाएवढ्या क्षेत्रफळाचे जंगल नष्ट होत आहे. तर एका वर्षात, वॉशिंग्टन राज्याच्या क्षेत्राएवढ्या जागेत जंगलतोड केली जात होती.

कितीतरी वृक्ष, झाडे, वेली, पतंग, प्राणी आणि पक्ष्यांच्या अनेक प्रजाती, आणि रेड इंडियन्ससुद्धा, या सर्वांसाठी पर्जन्य-वन हे एकमेव घर होते, ते आता धोक्यात आले आहे. शास्त्रज्ञ आणि पर्यावरणशास्त्रज्ञांनी असा इशारा दिला आहे की हे जंगल जर नष्ट झाले तर नक्कीच संपूर्ण ग्रह विनाश पावेल.

इतर देशांनी ब्राझीलला पर्जन्य-वनातील हा विनाश थांबवण्याचे आवाहन केले. परंतु या अत्यंत गरीब देशासाठी या भागाचा विकास होणे आणि त्यामागचे आर्थिक फायदे खूप महत्वाचे होते.

सुरक्षित संकलन क्षेत्रे स्थापन करण्याच्या प्रस्तावातून असे दिसून आले की, पर्जन्य-वनाच्या वातावरणाला कोणतेही नुकसान न करता जंगलातून अनेक फायदेशीर उत्पादने तयार करणे शक्य आहे. खरं तर, पशुपालनापेक्षा अशाप्रकारे जंगलाचा उपयोग करणे अधिक फायदेशीर ठरू शकते.

वीस वर्षांच्या कालावधीत, एक एकर जागेमध्ये केवळ १५.०५ डॉलर किंमतीचे जनावरांचे मांस तयार होईल. परंतु जर रबर, बिया आणि इतर दीर्घकालीन उत्पादनांसाठी तेवढाच भूभाग(१एकर) वापरला तर त्याचे मूल्य $ ७२.७९ पेक्षा जास्त होईल. आणि हे शाश्वत असेल. पिढ्यांनपिढ्या हे उत्पादन मिळत राहील, तर पशुसंवर्धनासाठी वापरली जाणारी जमीन लवकरच नष्ट होईल.



दीर्घकालीन शेतीच्या माध्यमातून जंगलांचे जतन करून देशाची आर्थिक प्रगतीसुद्धा शक्य झाली हे चिको मेंडिस यांनी जगासमोर सिद्ध केले. जेव्हा मेंडिसने सुरक्षित संकलन क्षेत्रे तयार करण्याची मोहीम सुरू केली तेव्हा जगभरातील पर्यावरणवाद्यांनी याची दखल घेतली व त्यांचे कौतुक केले.

मार्च १९८७ मध्ये अमेरिकेच्या पर्यावरण संस्थांनी मेंडिस यांना वॉशिंग्टनला येण्याचे आमंत्रण दिले. तेथे त्यांनी देशभरातील सिनेट आणि कॉग्रेसच्या सदस्यांसमोर भाषण दिले; पर्जन्य-वन वाचविण्यासाठी केलेल्या संघर्षाबद्दल त्यांना माहिती दिली. या सामर्थ्यवान, दृढनिश्चयी, नम्र, ब्राझिलियन जंगलातील रबर टॅपरला भेटलेला प्रत्येकजण प्रभावित झाला.

त्याच वर्षी संयुक्त राष्ट्राने पर्जन्य-वनावर (रेन फॉरेस्टवर) केलेल्या कामाबद्दल चिको मॅन्डिस यांना पुरस्कार देऊन सन्मानित केले. त्या जोडीला त्यांना बेटर वर्ल्ड सोसायटीने पर्यावरण रक्षणाकरता पदकही प्रदान केले. बेटर वर्ल्ड सोसायटीच्या या सन्मान सोहळ्यात मेंडिस यांनी प्रेक्षकांना या सोप्या शब्दांनी संबोधित केले:

"मी एक रबराचा चीक गोळा करणारा रबर टॅपर आहे. माझी माणसं गेली १३० वर्षे या पर्जन्य-वनात राहत आहेत. कुठलेही नुकसान न करता जंगलाची संसाधने वापरत आहेत. आम्ही अमेरिकेच्या लोकांना आम्हाला मदत करण्याचे आवाहन करतो. आपण सर्व एकत्रपणे जंगलाचे रक्षण करू शकतो आणि उत्पादन क्षमता सुद्धा वापरू शकतो. याही पुढे भविष्यातील पिढ्यांसाठी आम्ही हा अफाट खजिना सुरक्षित ठेवू शकतो."



जंगल वाचविण्याच्या धडपडीत चिको आता एकटा नव्हता. “यापूर्वी सर्वसामान्यांमध्ये पर्जन्य-वनाच्या प्रश्नाबाबत फारशी चर्चा होत नव्हती,” मेंडिस म्हणाले. "आम्ही ही लढाई एकाकी लढत होतो." परंतु आता जगभरातील लोक मेंडिस आणि त्यांचे सहकारी रबर टॅपर्ससह त्यांच्या संघर्षात सामील होत आहेत.

जून १९८८ मध्ये मेंडिस यांचे बालपण जिथे गेले त्या सेरिंगल कचोइराला पहिले सुरक्षित संचयन क्षेत्र घोषित केले गेले. त्यानंतर त्यावर्षी आणखी तीन क्षेत्रेही सुरक्षित झोन करण्यात आली. सरते शेवटी, आता हा जंगल वाचवण्यासाठीचा लढा पुढे सरकायला लागला.

**"माझ्या अंत्यसंस्कारावेळी मला फुले नको आहेत, कारण मला माहीत आहे की ती जंगलातून तोडून आणली असतील"**

## प्रकरण ७ : लढा सुरूच

"चिको मेंडिस ख्रिसमसपर्यंत नसेल."

डिसेंबर १९८८ मध्ये, हे शब्द हलक्या आवाजात एकर मधल्या घराघरातनं ऐकू आले. स्वत: मेंडिसनेही हे ऐकले होते. लवकरच आपली हत्या होईल अशी भीती त्याला वाटत होती.

सुरक्षित संकलन क्षेत्राच्या यशाने, कामगार संघटनेच्या सदस्यांविरूद्ध धमक्या आणि हिंसाचाराच्या घटनांमध्ये वाढ झाली होती. १९८० च्या उत्तरार्धात हजाराहून अधिक कामगार संघटनेचे सदस्य आणि रबर टॅपर मारले गेले.

चिको मेंडिसला मरायचे नव्हते. "जर आकाशातुन कोणी देवदूत खाली आला आणि माझ्या मृत्यूमुळे कामगार चळवळ अधिक बळकट होईल याची त्याने हमी दिली तर माझी याला काहीच हरकत नसेल," मेंडिस यांनी आपल्या मृत्यूच्या काही काळापूर्वीच एक पत्र लिहिले होते. "पण प्रत्यक्षात असं होत नसतं," तो म्हणाला. "भव्य अंत्यसंस्कार आणि मोठ्या मिरवणुकीमधून होणाऱ्या गर्दीमुळे आम्ही पर्जन्य-वन वाचवू शकत नाही. मला जगायचे आहे."

चिकोसाठी, त्याचं कुटुंब, ज्यात आता त्याचा दोन वर्षांचा मुलगा सँडिनो आहे, अत्यंत महत्वाचे होते. आपल्या पत्नी आणि मुलांना त्रास व्हावा असे कधीच वाटत नसे. त्यांनी निराधार व्हावे अशी त्याची बिलकुल इच्छा नव्हती पण तरीही त्याला वाटले की तो हा संघर्ष सोडू शकत नाही



"आम्ही या लढाईपासून पळ काढू शकत नाही," मेंडिस ठामपणे सांगत. "आम्ही संघर्ष चालू ठेवला पाहिजे. आम्ही आमच्या साथी कामगारांचे मरणांकीत हाल बघू शकत नाही."

चिको मेंडिस यांच्या हत्येचे तोपर्यंत सहा प्रयत्न झाले पण ते त्यातून वाचले. जिथे जिथे जायचे तिथे त्यांना बरोबर अंगरक्षक घ्यावे लागत. २० डिसेंबर रोजी मेंडिस सेना मादुरेराच्या जंगलातील एका मोठ्या गावी दूरचा प्रवास करून गेले, तेथे त्यांनी कामगार संघटनेत ४०० हून अधिक टॅपर्सचा समावेश केला. त्याच्या मित्रांनी त्याला झ्यापुरीपासून दूर राहण्याचा इशारा दिला असला तरी मेंडिस घरी परतण्यासाठी आग्रही होते. त्यांना कुटुंबासमवेत ख्रिसमस साजरा करायचा होता.

२२ डिसेंबर १९८८ रोजी संध्याकाळी मेंडिस आपल्या अंगरक्षकांसह झ्यापुरी येथील घरातच होते. संध्याकाळी काही वेळ ते डोमिनोईस खेळले (एक फासे टाकून खेळायचा खेळ.) रात्रीच्या जेवणापूर्वी त्यांनी आंघोळ करायचं ठरवलं. बाथरूम त्यांच्या घरापासून वेगळ्या इमारतीत होतं.

त्यांच्या घराच्या मागे जंगलाच्या दाट झाडीत लपलेला मारेकरी मेंडिसची वाट पहात होता.

मेंडिस मागच्या दारातून बाहेर पडले. जेव्हा त्यांनी अंधारात विजेरी पेटविली तेव्हा जणू काय त्यांनी स्वत:ला मारेकऱ्याच्या स्वाधीन केले. तेवढ्यात अंधारातून गोळ्यांचा वर्षाव झाला. मेंडिस लडखडत घराकडे आले.
आणि काही क्षणातच त्यांचा मृत्यू झाला.



जगभरातील वर्तमानपत्रांत चिको मेंडिसच्या मृत्यूच्या बातम्या पहिल्या पानावर छापून आल्या. त्याच्या अंत्यसंस्कारासाठी हजाराहून अधिक लोक उपस्थित होते.

मुसळधार पावसात भिजत ते सर्व, शांतपणे चालत चर्चकडे गेले. त्यातील एकजण लाकडी क्रॉसवर बसवलेल्या मेंडिसच्या विशाल छायाचित्रांसह चालत होता. राजकारणी, चित्रपट निर्माते, अभिनेते, पत्रकार, वैज्ञानिक आणि पर्यावरणशास्त्रज्ञही रबर टॅपर्सच्या जोडीने त्यांच्या आक्रोशात आणि दुःखात सामील झाले.

हेच लोक होते ज्यांना माहीत होतं, मेंडिस यांनी जंगल वाचविण्यासाठी संघर्ष केला.
"माझ्या अंत्यसंस्कारावेळी मला फुले नको आहेत,” एकदा चिको मेंडिस म्हणाले, “कारण मला माहीत आहे की ती जंगलातून तोडून आणली असतील"

पण आजच्या या प्रसंगी मेंडिसच्या मित्रांनी त्यांच्या इच्छेची पर्वा केली नाही. त्यांच्या थडग्यावर सुंदर ताजी फुलं अर्पण केली गेली.

२६ डिसेंबर १९८८ रोजी डार्सी अल्व्हस परेरा या पशुपालकाच्या मुलाने मेंडिसच्या हत्येचा गुन्हा कबूल केला. डिसेंबर १९९१ मध्ये, झ्यापुरीच्या कोर्टात गर्दी झाली होती खटल्याची सुनावणी ऐकण्यासाठी २०० पेक्षा जास्त लोक गर्दी करून होते. ब्राझीलच्या वर्तमानपत्रांनी शतकातील सर्वात मोठा खटला म्हणून त्याचे वर्णन केले होते. २२ वर्षीय परेरा आणि त्याचे वडील डार्ले अल्वेस दा सिल्वा या दोघांनाही चिको मेंडिसच्या हत्येसाठी दोषी ठरविण्यात आले. दोघांनाही १९ वर्षांच्या तुरूंगवासाची शिक्षा सुनावण्यात आली.

चिको मेंडिस यांचे जीवन आणि मृत्यू संपूर्ण पृथ्वी, पर्जन्य-वन आणि तेथील लोकांच्या संरक्षणासाठी वाहिले गेले होते. मेंडिस यांनी ठामपणे सांगितले की, "आम्ही कोणत्याही किंमतीवर अमेझोनियाचा विनाश सहन करणार नाही. ॲमेझॉनच्या विध्वंसामुळे केवळ जंगलातील लोकच नव्हे तर संपूर्ण पृथ्वीलाही धोका निर्माण होईल."

मेंडिसचे मित्र आणि अनुयायी त्याच्या मृत्यूने दु:खी झाले. पण त्यांनी हार मानली नाही. त्यांचा असा विश्वास होता की बंदुकीची एक गोळी चिकोचा, पर्जन्य-वनासाठीचा संघर्ष थांबू शकणार नाही.

मार्च १९८९ मध्ये, २०० रबर टॅपर्स आणि रेड इंडियन चिको मेंडिसने योजलेल्या परिषदेसाठी एकत्र जमले. ही अलायन्स ऑफ पीपल्स ऑफ फॉरेस्ट ची पहिली परिषद / सभा होती. चिकोचा चुलतभाऊ सेबॅस्टिओ यांनी या सभेला संबोधित केले: "आमच्या जोडीदाराची हत्या करून, त्यांनी असा विचार केला असेल की ते आमची चळवळ संपवू शकतील. परंतु ते चुकीचं आहे. आज आम्ही त्या जोडीदाराच्या संघर्षाप्रती आमची वचनबद्धता जाहीर करतो"

मार्च १९८९ च्या या सभेनंतर "वन-रहिवाशांची घोषणा" जारी करण्यात आली. त्यात लिहिले होते:

"जंगलांच्या रहिवाशांची आपले क्षेत्र सुरक्षित रहावे अशी इच्छा आहे. ही संस्था आपल्या कमाईचा आणि आपल्या संस्कृतीचा आधार असलेल्या या विस्तीर्ण परंतु नाजूक जीवनशैलीच्या संरक्षणासाठी सर्व प्रयत्न करेल."
फक्त चिको मेंडिसमुळेच आज जगभरातील लोक पर्जन्य-वनसंरक्षणासाठी काम करत आहेत. पर्जन्य-वनांविषयी लिहिलेले लेख आणि त्यांची पुस्तके, त्यांचे पर्यावरणशास्त्र लोकांना शाश्वत शेतीचे महत्त्व शिकवत आहेत. बऱ्याच लोकांनी पर्जन्य-वनातील झाडांपासून बनवलेल्या वस्तू खरेदी करणे, किंवा पर्जन्य-वनात वाढलेल्या प्राण्यांचे मांस खाणे बंद केले आहे, आणि अशा प्रकारे मेंडिसच्या कार्यास पाठिंबा दर्शविला आहे.

त्यांच्या अंत्यसंस्काराच्यावेळी, चिकोच्या एका मित्राने आपल्या सर्व समर्थकांच्या वतीने सांगितले: "चिको अजूनही त्याने केलेल्या सर्व गोष्टींमुळे आणि त्याने सांगितलेल्या तत्त्वांमध्ये जिवंत आहे. हा संघर्ष सुरू ठेवण्यासाठी आम्ही वचनबद्ध आहेत. "या पृथ्वीच्या सधन आणि वैविध्यपूर्ण परिसंस्थेच्या संरक्षणासाठी लोक जिथे जिथे लढा देत आहेत, तिथे तिथे ही बांधिलकी आजही कायम आहे.

समाप्त